# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

## शासन आदेश क्रमांकः कअनि - ११२०/प्र.क्र.०५/१४-ब

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: ३१ जानेवारी, २०२०

## आदेश

श्री.दे.सा.भगुरे, कक्ष अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या सेवा "महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोग" यांच्या अधिपत्याखालील राज्य सेवा हक्क आयोग, कोकण विभाग या कार्यालयातील कक्ष अधिकारी या पदावर प्रतिनियुक्तीने एक वर्ष कालावधीसाठी खालील अटींच्या अधीन राहून सुपूर्द करण्यात येत आहेत.

अ) श्री. भगुरे ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल त्यानंतर एक वर्षांनी प्रतिनियुक्तीच्या पदाचा कार्यभार सुपूर्द करुन त्यांच्या मूळ विभागात ज्या तारखेला रुजू होतील त्या तारखेला त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होईल.

ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/सक्षम प्राधिकारी राखून ठेवील.

क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठवण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठवण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला/ सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

ड) त्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/ सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

२. म.ना.से.(पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा ..इ) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट - दोन) मधील तरतुदी विचारात घेऊन सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्र. १८ तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग (आस्थापना) यांनी प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती, आपापसात सल्लामसलत करुन ठरवाव्यात.

३. श्री. भगुरे यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्र.१८ तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग (आस्थापना) यांचेमार्फत हाताळण्यात येतील.

४. श्री. भगुरे यांना प्रतिनियुक्तीच्या ठिकाणी रूजू होण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाने तात्काळ कार्यमुक्त करावे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१३११७४१०७७६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan
Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2020.01.31 17:19:35 +05'30'

**(ग.भि.गुरव)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति**

श्री.दे.सा.भगुरे, कक्ष अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव,सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२) सचिव (र.व.का.) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३) मा.राज्य मुख्य लोकसेवा हक्क आयुक्त, ७ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई.
४) सह/उप सचिव, राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त कार्यालय, ७ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई.
५) सह/ उप सचिव (र.व का.), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ .
६) सह/ उप सचिव (आस्थापना) , सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
त्यांना विनंती करण्यात येते की, प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती नमूद केलेल्या आदेशाची एक प्रत या कार्यासनाकडे पाठविण्यात यावी.
७) निवडनस्ती (कार्या-१४ब).